**१४ व्या वित्त आयोगांतर्गत स्थापन केलेल्या २४ जलदगती न्यायालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्रमांक : जगन्या १४१८/प्र.क्र.६४/का.नऊ**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,

दिनांक :- २३ मार्च, २०२२

**वाचा :-**१) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.अेचसीटी-१००२/१२८९/(१६२)/नऊ, दि.०८.०९.२००३

२) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.जगन्या-१४१६/प्र.क्र.२०४/का-९, दि.१८.०८.२०१७

३) जिल्हा न्यायालय, रायगड-अलिबाग जा. क्र.प्रशा/६२४४/सन२०२१,दि.१७.१२.२०२१चे पत्र

४) जिल्हा व सत्र न्यायालय, अमरावती म.जा. क्र.ब-४(आस्था)/५६/२०२२,दि.५.१.२०२२ चे पत्र

५) जिल्हा न्यायालय, ठाणे जा. क्र.(आस्था)/१४५/२०२२, दि.०६.०१.२०२२ चे पत्र.

६) जिल्हा न्यायालय, यवतमाळ जा. क्र.२४७/आस्था/२०२२, दि.१४.०१.२०२२ चे पत्र.

७) जिल्हा न्यायालय, उस्मानाबाद जा. क्र. काव्यवि/प्रशा/४५७,दि.१८.०१.२०२२ चे पत्र.

८) जिल्हा न्यायालय, रत्नागिरी म.जा. क्र.ब-४/४१० सन२०२२,दि.२०.०१.२०२२ चे पत्र.

९) जिल्हा व सत्र न्यायालय, नांदेड जा. क्र. ब-४(१०)/७५५/२०२१, दि.२०.०१.२०२२ चे पत्र.

१०) जिल्हा व सत्र न्यायालय, परभणी जा. क्र. आस्था/ब-४/९८०/२०२२,दि.२४.०१.२०२२ पत्र

११) जिल्हा न्यायालय, वाशिम जा. क्र. /आस्था/५३५/२०२२, दि.०८.०२.२०२२ चे पत्र

१२) जिल्हा न्यायालय, भंडारा क्र.६१(ए)/६४५/१९५९,भाग-८, दि.१६.०२.२०२२ चे पत्र.

१३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.२२.०२.२०२२

**प्रस्तावना :-**

१४ व्या वित्त आयोगांतर्गत एकूण २४ जलदगती न्यायालये स्थापन करण्यात आली असून, या २४ जलदगती न्यायालयासाठी संदर्भीय अ.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये पदनिर्मिती करण्यात आली आहे. या २४ जलदगती न्यायालयांसाठीच्या अस्थायी पदांना पुढील कालावधीसाठी मुदतवाढ देणे आवश्यक आहे. न्यायालयांच्या अस्थायी पदांबाबत संदर्भीय अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये वित्त विभागाच्या दि.१०.९.२००१ च्या शासन निर्णयातील तरतूदीमधुन वगळण्यात आले आहे. तसेच संदर्भीय अ.क्र.१३ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२२ ते दि.३१.०८.२०२२ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार सदर २४ जलदगती न्यायालयांसाठीची अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१४ व्या वित्त आयोगांतर्गत स्थापन केलेल्या २४ जलदगती न्यायालयांसाठीच्या पुढील अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२२ ते दि.३१.०८.२०२२ पर्यत मुदतवाढ देण्यात येत आहे.

जिल्हा न्यायाधीश संवर्ग

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | जिल्हा न्यायाधीश | १२ |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | १२ |
| ३ | वरिष्ठ लिपिक | १२ |
| ४ | कनिष्ठ लिपिक | १२ |
| ५ | शिपाई | २४ |
| | **एकूण पदे** | ७२ |

दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) आणि न्यायदंडाधिकारी संवर्ग

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) आणि न्यायदंडाधिकारी | १२ |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | १२ |
| ३ | वरिष्ठ लिपिक | १२ |
| ४ | कनिष्ठ लिपिक | १२ |
| ५ | शिपाई | २४ |
| | **एकूण पदे** | ७२ |

२. याकरिता येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान-१०२-उच्च न्यायालये (१३) १४ व्या वित्त आयोगांतर्गत योजना (१३)(०१) जलदगती न्यायालये (अनिवार्य), संकेतांक क्र. (२०१४ ०५९३), या लेखाशिर्षाखाली" संबंधित वित्तीय वर्षासाठी मंजुर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२२.०२.२०२२ द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२२०३२३१६२३००५५१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HODAWADEKAR
ANAND BHARAT

Digitally signed by HODAWADEKAR ANAND BHARAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0fccc37dcb4df84557086c3e03ca2237fcb16310ff5175370bf8e7719a02477e, pseudonym=B5831A1A752C2B9B028DAE403EFAAEE70CBC5944, serialNumber=22A102F28897F7CAE68B80F4942F265D6F71566570CEC799DFB3DB3B60C8864F, cn=HODAWADEKAR ANAND BHARAT
Date: 2022.03.23 16:25:36 +05'30'

**( आनंद भारत होडावडेकर )**
**उप विधि सल्लागार-नि-उप सचिव**

**प्रति :-**

१) मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई ,

२) प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई

३) प्रमुख न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, लातूर, रत्नागिरी, बीड, अमरावती, परभणी, पुणे, अहमदनगर, बुलढाणा, ठाणे, नांदेड, रायगड-अलिबाग, सातारा,उस्मानाबाद, वाशिम, भंडारा, यवतमाळ.

४) महालेखापाल-एक/दोन (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,

५) महालेखापाल-एक/दोन ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,

६) जिल्हा कोषागार अधिकारी,  लातूर, रत्नागिरी, बीड, अमरावती, परभणी, पुणे, अहमदनगर, बुलढाणा, ठाणे, नांदेड, रायगड-अलिबाग, सातारा,उस्मानाबाद, वाशिम, भंडारा, यवतमाळ

७) वित्त विभाग व्यय-५,

८) विधि व न्याय विभाग कार्यासन-२३, २४ व २५

९) निवड नस्ती- का. ९.